सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण (४४०६ ०४९२) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२२/प्र.क्र.४०/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०२ मार्च, २०२३

वाचा:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक २२.०७.२०२२
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक२७.०७.२०२२
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक २९.०९२०२२.
५) महसूल व वन विभाग, शासन समक्रमांक दिनांक २२.१२.२०२२ रोजीचे पत्र.
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.२४/२०२२-२३/५६६, दिनांक २३.१२.२०२३
७) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०३.०१.२०२३
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक ,(नियोजन व विकास ,अर्थसंकल्प) नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.२४/२०२२-२३/६७४, दिनांक २५.०१.२०२३
९) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०८.०२.२०२३
१०) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.२४/७५९/२०२२-२३, दिनांक २१.०२.२०२३

प्रस्तावना:-

वन आणि वनेतर क्षेत्रात वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता राज्य योजनेंतर्गत सन २०२२-२३ करीता **"सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)"** या योजनेंतर्गत रु. ८६६९३.८२ लक्ष इतका निधी (०२-मजूरी अंतर्गत रु. ५४९११.८६ लक्ष + २१-पुरवठा व सामग्री रु.३१७८१.९६ लक्ष) अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर योजनेंतर्गत ३ योजनांकरिता अर्थसंकल्पीत निधी पुढीलप्रमाणे आहे :-

| अ. क्र. | योजनेचे नाव | अर्थसंकल्पीत निधी (रू. लाखात) | | |
|---|---|---|---|---|
| | | ०२-मजूरी | २१-पुरवठा व सामुग्री | एकूण |
| १ | वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम | ३३६७७.१९ | १९४९१.७३ | ५३१६८.९२ |
| २ | महत्वाचे रस्ते, कालवे व रस्त्यांच्या दुतर्फा वृक्ष लागवड | २०७२१.४३ | ११९९३.१७ | ३२७१४.६० |
| ३ | महत्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा असणाऱ्या टेकडयांचे हरितीकरण | ५१३.२४ | २९७.०६ | ८१०.३० |
| **एकूण** | | **५४९११.८६** | **३१७८१.९६** | **८६६९३.८२** |

०२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ चे परिपत्रकान्वये वित्तिय वर्ष सन २०२२-२३ करिता अर्थसंकल्पीय तरतूदीची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२२-२३ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२२ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच निधी वितरीत करताना मासिक निधी विवरणपत्रात (कॅश फ्लो स्टेटमेंट) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविण्यात आलेल्या आहेत, त्याच्याशी सुसंगत असाव्यात, असे नमूद करण्यात आले आहे. तथापि, वित्त विभाग, संदर्भाधीन क्र. ९ येथील दिनांक ०८.०२.२०२३ रोजीच्या परिपत्रान्वये निधी वितरणासंदर्भात सुधारित सुचना निर्गमित करण्यात आलेल्या असून त्यानुसार सदर लेखाशिर्षाकरीता ०२-मजुरी व २१-पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टांकरीता निधी वितरणाची मर्यादा अनुक्रमे ९५% व ७०% इतकी निश्चित करण्यात आलेली आहे.

०३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या संदर्भ क्र. ६ व ८ येथे नमूद पत्रान्वये वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम या योजनेंतर्गत पूर्व पावसाळी कामांचा एकूण ३०७७५.५९ लक्ष इतक्या रकमेचा चालूबाब प्रस्ताव शासनास सादर करण्यात आलेला आहे. तसेच संदर्भाधीन क्रमांक २, ३, ४ व ७ येथे नमूद शासन निर्णयाच्या संदर्भामध्ये नमूद शासनास प्राप्त प्रस्तावानुषंगाने शिल्लक असलेला निधी वितरीत करण्याबाबतची विनंती संदर्भाधीन क्र. १० येथील पत्रान्वये शासनास करण्यात आलेली आहे.

०४. नमूद करण्यात येते की, उपरोक्त संदर्भ क्र. २, ३, ४ व ७ येथे नमूद शासन निर्णयांन्वये "सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२)" या योजनेंतर्गत ०२-मजूरी व २१-पुरवठा व सामग्री अंतर्गत वितरित करण्यात आलेल्या निधीचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

**(रु. लाखात)**

| **सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम अंतर्गत** | **सन २०२२-२३ मंजुर नियतव्यय** | **वितरीत निधी** | | |
|---|---|---|---|---|
| | | **०२ -मजूरी** | **२१ -पुरवठा व सामुग्री** | **एकूण** |
| वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम | ५३१६८.९२ | १७८१६.०९ | ७५८२.७८ | २५३९८.८७ |
| महत्त्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा टेकडयांचे हरितीकरण | ८१०.३० | २८७.४ | १२४.७५ | ४१२.१५ |
| महत्त्वाचे रस्ते/रेल्वे/कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवड | ३२७१४.६० | ११६०४ | ५०३७.१२ | १६६४१.१२ |
| **एकूण** | **८६६९३.८२** | **२९७०७.४९** | **१२७४४.६५** | **४२४५२.१४** |

आता, सदर योजनेंतर्गत उक्त तीन योजनांकरिता ०२-मजुरी तसेच २१-साहित्य व पुरवठा या उद्दिष्टाकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात (००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) या योजनांतर्गत योजनांकरिता ०२-मजुरी व २१-पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टांतर्गत पुढीलप्रमाणे निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| | | | | **(रु. लाखात)** |
|---|---|---|---|---|
| **सामुहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम अंतर्गत** | **सन २०२२-२३ मंजुर नियतव्यय** | **वितरित करावयाचा निधी** | | |
| | | **०२ -मजूरी** | **२१ -साहित्य व पुरवठा** | **एकूण** |
| वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम | ५३१६८.९२ | १४१७७.२४१ | ६०६१.४३१ | २०२३८.६७२ |
| महत्त्वाच्या रस्त्यांच्या दुतर्फा टेकडयांचे हरितीकरण | ८१०.३० | २००.१७८ | ८३.१९२ | २८३.३७० |
| महत्त्वाचे रस्ते/रेल्वे/कालवे/ दुतर्फा वृक्ष लागवड | ३२७१४.६० | ८०८१.३५९ | ३३५८.०९९ | ११४३९.४५८ |
| **एकुण** | **८६६९३.८२** | **२२४५८.७७७** | **९५०२.७२२** | **३१९६१.४९९** |

०२. उपरोक्त संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयाच्या परिच्छेद क्र. २ मध्ये चेनलिंक फेन्सिंगबाबत नमूद करण्यात आलेल्या अटींच्या अनुषंगाने कार्यवाहीची पुर्तता केल्याबाबत अहवाल Geo Tag Photos आणि उपयोगिता प्रमाणपत्र (UC) यांचेसह ७ दिवसांत शासनास सादर करण्याच्या अटीवर निधी वितरीत करण्यात यावा. तसेच या शासन निर्णयान्वये वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम योजनेंतर्गत वितरीत करण्यात येत असलेल्या निधीतून देखील ज्या वनवृत्तात चेनलिंक फेन्सिंगची कामे करण्यात येणार आहेत त्या वनवृत्तांना संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक २ मधील अटी लागू असतील याची संनियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

०३. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. उपरोक्त संदर्भाधी शासन निर्णयान्वये

वेळोवेळी देण्यात आलेल्या सुचनांच्या अनुषंगाने कार्यवाही न झाल्यास त्याबाबत सर्वस्वी जबाबदारी ही नियंत्रण अधिकारी यांची राहील.

०४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) हे वर्ष २०२२-२३ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतील.

०५. ज्या प्रकरणी वन परिक्षेत्र अधिकारी/सहायक वनसंरक्षक यांनी त्यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराबाहेर तांत्रिक/प्रशासकीय मान्यता दिली आहे, अशा प्रकरणी सक्षम अधिकाऱ्यांनी सुधारित तांत्रिक/प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे, याबाबत खातरजमा करुनच प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर व प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), पुणे यांनी सदर निधी वितरीत करावा. तांत्रिक/प्रशासकीय मान्यता दिल्याची खातरजमा करुनच सदर निधी वितरीत करण्यात यावा.

०६. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२२-२३ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

०७. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ व ९ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

०८. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

०९. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-१०,**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**
**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन (४४०६ ०४९२ ).**
**०२- मजूरी, २१- साहित्य व पुरवठा**

१०. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दिनांक ०४.०४.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३०२१९०१४६९०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2023.03.02 19:07:24 +05'30'

**(विनायक बा. इंगळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. निवडनस्ती फ-११.

.